# तरूण क्लेरा बार्टन

## रणांगणातील नर्स





क्लेरा बार्टन एक शूर स्त्री होती. नागरी युद्धादरम्यान तिने जखमी सैनिकांची शुश्रुषा केली आणि त्यांना दवापाणी दिले. तिने अमेरिकन रेडक्रॉस गट स्थापन केला. हा गट गरजू लोकांना मदत करतो.

क्लेरिसा हार्लो बार्टनचा जन्म 25 डिसेंबर 1821 रोजी अमेरिकेच्या मॅसेच्युसेट्स राज्यात झाला. सगळे तिला क्लेरा म्हणत.

क्लेरा कुटुंबात सर्वात लहान होती. तिला दोन भाऊ आणि दोन बहिणी होत्या.





क्लेराला वडिलांकडून गोष्टी ऐकायला खूप आवडे. तिचे वडील सीमेवर सैनिक होते. तेथील अनेक रोमांचक गोष्टींचा खजिना त्यांच्याकडे होता.

लवकरच क्लेरा शाळेत जाऊ लागली. त्या शहरात एकच शाळा होती. या शाळेत फक्त एकच खोली होती. क्लेरा अभ्यासात हुशार होती.



भूगोल हा क्लेराचा आवडीचा विषय होता. तिला नकाशे बघत बसायला आवडत असे.





क्लेरा लाजरी-बुजरी होती. मुलांमध्ये मिसळणे, मैत्री करणे तिला अवघड जायचे.



पण कुणाला मदतीची गरज असेल तर क्लेरा अजिबात लाजत नसे. ती 11 वर्षांची होती तेव्हा तिचा भाऊ गोदामाच्या छतावरून खाली पडला. त्याला मोठी दुखापत झाली. क्लेरा त्याची नर्स बनली. भाऊ बरा होईपर्यंत दोन वर्षे तिने त्याची देखभाल केली.

ती 17 वर्षांची झाली तेव्हा तिने इतर मुलांना शिक्षण मिळण्यासाठी मदत करण्याचे ठरवले. त्यासाठी ती शिक्षिका बनली.





क्लेराचे काही विद्यार्थी तर जवळपास तिच्याच वयाचे होते. पण ती एक चांगली शिक्षिका होती आणि सर्व विद्यार्थी तिच्यावर प्रेम करत.

क्लेराने 18 वर्षे शिक्षिका म्हणून काम केले. 1854 साली ती वॉशिंग्टन डी.सी. येथे गेली. तेथील पेटंट कार्यालयात ती पहिली महिला कारकून बनली.



त्या काळात अमेरिकेच्या दक्षिणेकडील राज्यांमध्ये गुलामगिरीची प्रथा होती. परंतु उत्तरेकडील बहुतेक राज्यांमध्ये ही प्रथा नव्हती. गुलामगिरी प्रथा उचित की अनुचित, यावर लोकांमध्ये मतभेद होते.



गुलामगिरी प्रथेमुळे अमेरिका दोन भागांत विभागला गेला. यावरून 1861 साली अमेरिकेच्या उत्तर आणि दक्षिण भागांतील राज्यांमध्ये नागरी युद्ध सुरू झाले. युद्धात लढण्यासाठी तरुण आपणहून सहभागी झाले.

भयंकर मोठे युद्ध झाले. असंख्य सैनिक जखमी झाले किंवा ठार झाले. क्लेरा सैनिकांना मदत करू इच्छित होती.

काही वर्षांपूर्वी आपण आपल्या भावाची काळजी घेतली होती, हे क्लेराला आठवले. आपण जखमी सैनिकांचीही चांगली देखभाल करू शकतो, याची तिला खात्री वाटली.





क्लेरा नकाशे वाचण्यात हुशार होती. तिने रणांगणाचे नकाशे लक्षात ठेवले. यामुळे गरजू सैनिकांचा ठावठिकाणा कळताच त्यांना शोधणे सोपे जाऊ लागले.

क्लेरा रणांगणावर जायला घाबरत नसे. सैनिक उत्तर भागातील आहे की दक्षिण भागातील आहे, याची तिला पर्वा नव्हती. तिला फक्त त्यांना उपचार पुरवून बरे करायचे होते.

क्लेरा सैनिकांसाठी औषधे घेऊन येई. ती त्यांच्या जखमांवर मलमपट्टी करत असे. मोठ्या धैर्याने देखभाल करून तिने असंख्य सैनिकांचे प्राण वाचवले.





सैनिकांच्या देखभालीसाठी बराच पैसा खर्च होत असे. क्लेराला लोकांच्या मदतीची खूप गरज होती.





क्लेरा अद्याप लाजरी-बुजरी होती. पण जखमी सैनिकांसाठी मलमपट्ट्या, औषधे, अन्न, कपडे, साबण, टॉवेल आणि इतर वस्तू खरेदी करण्यासाठी तिला पैशाची गरज होती. त्यामुळे निधी उभारण्यासाठी ती निर्भय बनली. सगळीकडे फिरून तिने लोकांना मदतीचे आवाहन केले.

देशभरातील लोकांनी क्लेराबद्दल ऐकले. तिच्या या सत्कार्याबद्दल लोक तिला “रणांगणावरचा देवदूत” म्हणू लागले.



अखेरीस, 1865 साली नागरी युद्ध समाप्त झाले. पण क्लेराला अजून बरेच काम करायचे होते.





अध्यक्ष लिंकन यांनी क्लेराला बेपत्ता सैनिकांना शोधण्यात मदत करण्याची विनंती केली. क्लेराने हे काम आनंदाने स्वीकारले.



पण क्लेरा युरोपात असताना फ्रान्स आणि प्रशिया यांच्या दरम्यान युद्ध सुरू झाले. क्लेराने अमेरिकन सैनिकांना जशी मदत केली होती तशीच मदत युरोपीयन सैनिकांनाही केली.



चार वर्षे गेली. क्लेराला आरामाची गरज होती. तिने स्वित्झर्लंडला जायचे ठरवले.



स्वित्झर्लंडमध्ये क्लेराची भेट रेड-क्रॉस संघटनेच्या आंतरराष्ट्रीय समितीशी झाली. ही संघटना गरजू लोकांना मदत करत असे. अमेरिकेतही रेड-क्रॉस संघटना असावी, असे क्लेराच्या मनात आले.



म्हणून मग 1881 साली अमेरिकेत परतल्यावर क्लेराने अमेरिकन रेड-क्रॉस संघटना स्थापन केली. त्यात असंख्य लोक सहभागी झाले. गरजू लोकांना मदत कशी करावी, याचे प्रशिक्षण क्लेराने या लोकांना दिले.



आज वादळ, पूर आणि इतर आपत्तींमध्ये अमेरिकन रेड-क्रॉस संघटना लोकांची मदत करण्यास सदा तत्पर असते.



1912 साली क्लेरा बार्टनचे निधन झाले. युद्ध आणि शांती अशा दोन्ही समयी एक शूर आणि धाडसी स्त्री म्हणून सदोदीत तिचे स्मरण केले जाईल.

समाप्त